**सुधारित प्रशासकीय व वित्तीय मान्यता राज्यातील उत्कृष्ट सार्वजनिक गणेशोत्सव मंडळ पुरस्कार विजेते घोषित करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: पुलदे-२०२२/प्र.क्र.१३३/सां.का.२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय , मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३० मार्च, २०२३

**वाचा:-** १. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. पुलदे २०२२/प्र.क्र.१३३/ सा.का.२, दिनांक २६ ऑगस्ट, २०२२.

२. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. पुलदे २०२२/प्र.क्र.१३३/ सां.का.२, दिनांक ११, ऑक्टोबर, २०२२.

३. प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, प्रभादेवी, मुंबई यांचे क्रमांक पुलदे /२४७३, दि.२० मार्च,२०२३ रोजीचे पत्र

**प्रस्तावना:**

उपरोक्त संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मा. मुख्यमंत्री महोदयांच्या निदेशानुसार दि. ३१ ऑगस्ट, २०२२ ते दि. ९ सप्टेंबर, २०२२ या कालावधीत झालेल्या गणेशोत्सवातील उत्कृष्ट गणेशोत्सव मंडळांना शासनाकडून पुरस्कार देण्याचा निर्णय घेतला होता. त्यानुसार संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयातील **प्रपत्र अ** नुसार राज्यातील उत्कृष्ट सार्वजनिक गणेशोत्सव मंडळ पुरस्कार विजेते घोषित करण्यात आले होते. दिनांक १८.१०.२०२२ रोजी रविंद्र नाटय मंदिर येथे झालेल्या सार्वजनिक गणेशोत्सव पुरस्कार वितरण सोहळयासाठी रू. १२,८०,००० (अक्षरी रुपये बारा लाख ऐंशी हजार फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

आता, प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, प्रभादेवी, मुंबई यांनी उपरोक्त पुरस्कार वितरण सोहळयास झालेल्या प्रत्यक्ष खर्च रू.१७,५४,७७०/- (अक्षरी रुपये सतरा लक्ष चोपन्न हजार सातशे सत्तर फक्त) इतक्या खर्चास सुधारीत प्रशासकीय मान्यता व उर्वरीत रकमेस (रू.४,७४,७७०/-) वित्तीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदरहू प्रस्तावानुसार सुधारीत प्रशासकीय मान्यता व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, प्रभादेवी, मुंबई यांचेकडून दि.१८.१०.२०२२ रोजी राज्यातील उत्कृष्ट व सार्वजनिक गणेशोत्सव पुरस्कार वितरण सोहळा रविंद्र नाटय मंदिर, प्रभादेवी, मुंबई येथे आयोजित करण्यात आला होता. सदर कार्यक्रमासाठी झालेल्या प्रत्यक्ष खर्च रू. १७,५४,७७०/- (अक्षरी रुपये सतरा लक्ष चोपन्न हजार सातशे सत्तर फक्त) (खालील तक्त्यात दर्शविण्यात आलेल्या ) इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये सुधारीत प्रशासकीय मान्यता व उर्वरीत रू.४,७४,७७०/-(अक्षरी रूपये चार लक्ष चौ-याहत्तर हजार सातशे सत्तर फक्त) इतक्या रक्कमेस वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | बिलाचा तपशील | रक्कम (रूपये) |
|---|---|---|
| १ | पारितोषिक रक्कम | ८,५०,०००/- |
| २ | एस के युनिटी मल्टिसर्विसेस - कार्यक्रम समन्वय | १,५८,००२/- |
| ३ | एस के युनिटी मल्टिसर्विसेस (एल इ डी स्क्रीन ऑपरेशन, विडियो एडिटिंग, फोटोग्राफी) | १,३३,३४०/- |
| ४ | बांद्रा म्युजिक क्लब (वाद्यवृंद मानधन) | ३५,०००/- |
| ५ | इतर समन्वयक मानधन, रांगोळी, तुतारी | ३५,७९०/- |
| ६ | एशिया ट्रॉफी (सन्मानचिन्ह देयक) | २२,४२०/- |
| ७ | राकेश जोशी (यु ट्यूब लाईव्ह स्ट्रीमिंग ) | २५,०००/- |
| ८ | कामाक्षी क्रीएटीव्ह (पी आर मीडिया पब्लिसिटी) | १५,०००/- |
| ९ | जय महाराष्ट्र कम्युनिकेशन (आर्ट वर्क) | २२४०/- |
| १० | जान्हवी महेश नाईक (लाईट्स | ५९५०/- |
| ११ | आरंभ हॉस्पिटॅलिटी (रात्रीचे जेवण) | ७८,७५०/- |
| १२ | उत्सव रेस्टॉरंट (सकाळचा नाश्ता व जेवण) | ८३,९९१/- |
| १३ | एम.डी बांदेकर (डेकोरेशन) | २,०६,०८७/- |
| १४ | शुभंकर कारंडे (सेल्फी पॉईंट, निमंत्रण पत्रिका डिजाईन ) | १,०३,२००/- |
| | **एकूण रक्कम** | **१७,५४,७७०/-** |

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक “झेडडी- ०२,मुख्य लेखाशिर्ष २२०५ कला व संस्कृती(१०१) ललित कला शिक्षण (०७)(०१), पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी (२२०५ १४६३) ५०- इतर खर्च” (अनिवार्य) या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ या वर्षी मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, प्रभादेवी, मुंबई यांना यासाठी नियत्रंक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. सदर कार्यक्रमासाठी होणाऱ्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, प्रभादेवी, मुंबई यांनी शासनास एक महिन्याच्या आत सादर करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या, वि.अ.प्र.-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग दोन, दिनांक १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका१९७८, भाग-एक, उपविभाग -तीन अ.क्र.४, परिच्छेद २७ (२) (अ) नुसार प्रशासकीय विभागास असलेल्या प्राधिकारानुसार व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.११२/व्यय-१५, दिनांक १३.०३.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक संगणक क्रमांक २०२३०३३०१३१३४६५९२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA HEMANT WAGHMARE

Digitally signed by VIDYA HEMANT WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=4e214bf8a250420c28c2084d8dd965c0d454568322bd41981d48971712e51795, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F93EFE7B946BF26FF989D6E5E01E1B122B9EB4E3E4E6799CB8E82B2D33D58DFC, cn=VIDYA HEMANT WAGHMARE
Date: 2023.03.30 13:18:46 +05'30'

**( विद्या वाघमारे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री तथा वित्त मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई
८. वित्त विभाग (कार्यासन व्यय-१५/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई
९. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
११. उप सचिव (अर्थसंकल्प शाखा), पर्यटन व सांस्कृतिक विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. अवर सचिव (रोख शाखा /सांका-४), पर्यटन व सांस्कृतिक विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. निवडनस्ती/सांका-२.